सन २०१७-२०१८ ची जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना तयार करणे...
अतिरीक्त मार्गदर्शक तत्वे व कालबध्द कार्यक्रम..

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः टिएसपी-२०१६/ प्र.क्र.२३३ /कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - ०१ फेब्रुवारी, २०१७.

**वाचा -**

१) नि.वि, शासन परिपत्रक क्र.डिएपी १०१६ /प्र.क्र.१७४ /का-१४८१, दि.२५.७.२०१६.
२) आ.वि, शासन परिपत्रक क्र.टिएसपी २०१६ /प्र.क्र.२३३ /का.६,दि.१८.१०.२०१६.

**परिपत्रक :-**

विभागाच्या दिनांक १८ ऑक्टोबर,२०१६ च्या जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना मार्गदर्शक तत्त्वे व कालबध्द कार्यक्रमाच्या शासन परिपत्रकानुसार जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेसंबंधी मार्गदर्शक तत्त्वे याअगोदरच निर्गमित करण्यात आलेली आहेत. आता सदर शासन परिपत्रकान्वये जिल्हा वार्षिक योजनेशी संबंधित काही नविन मार्गदर्शक तत्त्वे, जिल्हा नियोजनाशी संबंधित बाबी इ. सुचना निर्गमित करण्यात येत आहेत.

१. जिल्हा आदिवासी उपयोजना सन २०१६-१७ करीता मागासवर्गीय कल्याण या उपविकासशीर्षाखालील "शासकीय आश्रमशाळांमध्ये मुलींच्या वसतिगृहांचे बांधकाम (लेखाशीर्ष ४२२५ ०५५२)" वगळता वसतिगृह व आश्रमशाळा इमारत बांधकामाच्या जिल्हास्तरावरील सर्व योजना या राज्यस्तरावर नव्याने वर्ग करण्यात आलेल्या होत्या. आता, **"शासकीय आश्रमशाळांमध्ये मुलींच्या वसतिगृहांचे बांधकाम (लेखाशीर्ष ४२२५ ०५५२)"** योजना सन २०१७-१८ करीता राज्य स्तरावर वर्ग करण्यात येत असून सदर योजनेखाली जिल्ह्यानी नियतव्यय प्रस्तावित करु नये.

२. सन २०१६-१७ करीता राज्यस्तरावरून ज्या योजना जिल्हास्तरावर नव्याने वर्ग करण्यात आलेल्या होत्या, अशा योजनांकरीता सन २०१६-१७ साठी वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेल्या नविन लेखाशिर्षांची जिल्हा स्तरावर MP-SIMS प्रणालीवर नोंद घेण्यासाठी तसेच राज्य स्तरावरून जिल्हा स्तरावर वर्ग केलेल्या काही योजना ह्या अगोदरपासूनच जिल्हास्तरावर कार्यान्वित असल्याने अशा योजनांकरीता जुन्याच लेखाशिर्षाखाली (वर्ग केलेल्या योजनेचे लेखाशिर्ष न वापरता) नियतव्यय प्रस्तावित करण्यासंदर्भात पुढील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

| अ.क्र. | राज्य योजनेतुन जिल्हा योजनेकडे प्रस्तावित योजना | जुने लेखाशिर्ष | वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेले नविन लेखाशिर्ष /जिल्हास्तरावर योजनेची द्विरूक्ती होत असल्यास वापरावयाचे लेखाशिर्ष/शेरा... |
|---|---|---|---|
| **अ** | **मुख्य लेखाशिर्ष २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक कल्याण** | | |
| १. | केंद्रवर्ती अर्थसंकल्प (न्युक्लिअस बजेट) | २२२५ १७०४ | २२२५ D९२१ |
| २. | कन्यादान योजना. | २२२५ ३५०२ | २२२५ D९३२ |
| ३. | भारत सरकार शिष्यवृत्ती | २२२५ C८९४ (TSP) | २२२५ D९४१ |
| | | २२२५ C९०२ (OTSP) | २२२५ D९५९ |
| ४. | सुवर्ण महोत्सवी आदिवासी पूर्व माध्यमिक शिष्यवृत्ती योजना | २२२५ D७५२ | सदर योजनेखाली नियतव्यय प्रस्तावित करण्याकरीता जिल्हास्तरावरून याअगोदर पासूनच कार्यान्वित असणारे २२२५ D०३७ लेखाशिर्ष वापरावे. |
| ५. | वैद्यकीय व तत्सम महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती . | २२२५ ३५२९ | २२२५ D९६८ |
| ६. | अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना दुधाळ जनावरांना (दोन गायी) पुरवठा करणे | २२२५ ३७३४ | आदिवासी उपयोजनेंतर्गत सदर योजनेची द्विरूक्ती होत असल्याने या योजनेसाठी नियतव्यय प्रस्तावित करण्याकरीता २४०३ D१४१ (TSP) व २४०३ १४३२ (OTSP) लेखाशिर्ष वापरावे. |
| ७. | आश्रमशाळांमध्ये क्रिडा स्पर्धांचे आयोजन करणे | २२२५ D७३४ | २२२५ E०१५ |
| ८. | नक्षलवाद्यांना गावबंदी केलेल्या गावांना प्रोत्साहन योजना | २२२५ ३४५८ | २२२५ D९८६ |
| ९. | आदिवासींना स्वयंपाकासाठी एल.पी.जी गॅस कनेक्शन उपलब्ध करुन देणे. | २२२५ ३७४३ | २२२५ D९९५ |
| १०. | पारधी समाजाच्या विकासासाठी विविध योजना राबविणे. | २२२५ D१२६ (OTSP) | २२२५ E००६ |
| **ब** | **मुख्य लेखाशिर्ष २४०६-पशुसंवर्धन** | | |
| १. | आदिवासी लाभार्थ्यांना संकरीत दुभत्या गायी, म्हैशी यांचे वितरण | २४०३ B९२४ | २४०३ D१४१ |
| २. | १०० मांसल कुक्कुटपक्षी पालनाद्वारे कुक्कुट व्यवसाय सुरु करणे. | २४०३ B९३३ | २४०३ D१५९ |

| | | | |
|---|---|---|---|
| ३. | अंशत: ठानबंद पध्दतीने संगोपन करण्यासाठी अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना शेळी गट वाटप करणे. | २४०३ B९५१ | २४०३ D१६८ |
| **क** | **मुख्य लेखाशिर्ष २४०६-वनीकरण व वन्य जीवन** | | |
| १. | संरक्षित वनाच्या लगतचे क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांना स्वयंपाकी गॅस व सौर कुकर यांचे वाटप | २४०६ ८१८६ | २४०६ A०७८ |
| २. | मध्यवर्ती रोपमळे व बी-बीयाणे तयार करण्यासाठी रोपमळे तयार करणे. | २४०६ ८६४२ (TSP) | आदिवासी उपयोजनेंतर्गत सदर योजनेची द्विरूक्ती होत असल्याने या योजनेसाठी नियतव्यय प्रस्तावित करण्याकरीता २४०६ ०९६२ (TSP) लेखाशिर्ष वापरावे. |
| ३. | सर्वसाधारण उपयोगाची झाडे लावणे | ४४०६ ३७६९ (TSP) | आदिवासी उपयोजनेंतर्गत सदर योजनेची द्विरूक्ती होत असल्याने या योजनेसाठी नियतव्यय प्रस्तावित करण्याकरीता जिल्हास्तरावरून या अगोदरच कार्यान्वित असणारे ४४०६ ०२८७ (TSP) लेखाशिर्ष वापरावे. |
| **ड** | **मुख्य लेखाशिर्ष २८०१-वीज** | | |
| १. | महाराष्ट्र राज्य विज वितरण कंपनी मर्यादित यांना अनुदान | २८०१ ५०८९ | आदिवासी उपयोजनेंतर्गत जिल्हास्तरावर सदर योजनेची द्विरूक्ती होत असल्याने या योजनेसाठी नियतव्यय प्रस्तावित करण्याकरीता जिल्हास्तरावरून या अगोदरच कार्यान्वित असणारे २८०१ २६९८ (TSP) लेखाशिर्ष वापरावे. |
| २. | महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरणास सहाय्यक अनुदान. | २८१० ००५२ | २८१० ०९५६ |
| **इ** | **मुख्य लेखाशिर्ष २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य** | | |
| १. | राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना. | २२१० ई४९१ | २२१० G२३३ |
| २. | राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान-राज्य आरोग्य संस्थांना सहाय्यक अनुदान | २२१० ई४५५ | २२१० G२४२ |
| **ई** | **मुख्य लेखाशिर्ष २७०२ लहान पाटबंधारे** | | |
| १. | स्थानिक क्षेत्रातील लघुपाटबंधाऱ्यांची कामे (० ते १०० हेक्टर) | २७०२ ८७६९ | आदिवासी उपयोजनेंतर्गत जिल्हास्तरावर सदर योजनेची |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | द्विरुक्ती होत असल्याने या योजनेसाठी नियतव्यय प्रस्तावित करण्याकरीता जिल्हास्तरावरून या अगोदरच कार्यान्वित असणारे २७०२ ४७७२ (TSP) लेखाशिर्ष वापरावे. |
| उ | **मुख्य लेखाशिर्ष ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च** | | |
| १. | मृदसंधारण उपयोजनांमार्फत जमिनीचा विकास (पडकई) | ४४०२ २४०२ | ४४०२ २६३६ |
| २. | मृदसंधारण उपयोजनांमार्फत जमिनीचा विकास | ४४०२ २४८५ (TSP) | ४४०२ १०१२ |
| ३. | मृदसंधारण उपयोजनांमार्फत जमिनीचा विकास | ४४०२ २४९४ (OTSP) | ४४०२ १२०१ |

३. विभागाच्या सन २०१७-१८ च्या मार्गदर्शक सूचनानुसार "शिक्षण व तंत्रशिक्षण" या उपविकास शिर्षाकरीता नियतव्यय प्रस्तावित करण्याची टक्केवारी ६% वरुन ३% वर केली आहे व यानुसार घट झालेली ३% तरतूद "पोषण" या उपविकासशीर्षाखाली वाढीव स्वरुपामध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. यानुषंगाने आदिवासी क्षेत्रांतर्गत कुपोषणासारख्या गंभीर समस्येवर मात करण्याकरीता "ग्रामबाल विकास केंद्र" (VCDC) लेखाशीर्ष २२३६ १७९४ ही योजना सन २०१६-१७ पासून चालू करण्यात आली असून सदर योजना सन २०१७-१८ करीता जिल्हास्तरावर नव्याने वर्ग करण्यात येत असून सदर योजनेकरीता आवश्यक नियतव्यय जिल्हास्तरावरुन "पोषण" या उपविकास शिर्षाखाली प्रस्तावित करण्याची जबाबदारी जिल्हा नियोजन समित्यांची राहील.

४. त्याचबरोबर कृषी विभागाच्या जिल्हास्तरावर राबविण्यात येणा-या वैयक्तीक लाभाच्या योजनांसाठी वनहक्क कायद्याद्वारे वैयक्तीक वनहक्क पट्टेधारकांना प्राध्यान्य देण्यात यावे व याची दक्षता कृषी विभागाची क्षेत्रिय यंत्रणा, प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प व जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. तसेच यासंबंधी योग्य कार्यवाही होत असल्याबाबतची शहानिशा करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प व अप्पर आयुक्त, आदिवासी विकास यांची राहील.

५. सर्व संबंधितांना असे सूचित करण्यात येते की, वर उल्लेखिलेल्या मार्गदर्शक सूचना लक्षात घेऊन जिल्हयांच्या योजनाबाबतचा आराखडा तयार करण्यात यावा. आदिवासी उपयोजनेंतर्गत मागासवर्गीयांचे कल्याण या शिर्षाखाली जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याची जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेवर राहिल. तसेच आदिवासी विकास उपयोजनेंतर्गत इतर विकास शिर्षाची जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव यांच्यावर राहिल. **जिल्हा योजनेच्या**

**<u>प्रस्तावाच्या १० प्रती आदिवासी विकास विभागाकडे व नियोजन विभागाकडे पाठवाव्यात. तसेच संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना सुध्दा त्याचवेळेस प्रती पाठविण्याची व्यवस्था करावी.</u>**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०२०११५१६२३१९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2017.02.02 15:11:14 +05'30'

**सु.ना.शिंदे**
शासनाचे उप सचिव.

**प्रत,**

मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई
मा.मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
सर्व अपर मुख्य सचिव / सर्व प्रधान सचिव / सचिव मंत्रालयीन विभाग
प्रधान सचिव (नियोजन विभाग) मंत्रालय,मुंबई.
सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय,मुंबई
अपर आयुक्त व सदस्य सचिव,विदर्भ वैधानिक विकास मंडळ,बी-२३/ए,साउथ अंबाझरी मार्ग,अंध विद्यालयाजवळ,नागपूर
सदस्य सचिव,मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, जिल्हाधिकारी कार्यालय कंपाऊड, तळमजला,औरंगाबाद-४३१००१
सदस्य सचिव,उर्वरित महाराष्ट्र वैद्यानिक विकास मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, १८,वा मजला, (पश्चिम बाजू) मंत्रालयासमोर,मुंबई-३२

कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, १९ वा मजला, (पश्चिम बाजू), मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक
सर्व अपर आयुक्त,आदिवासी विकास,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ (१५ प्रति)
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
सर्व विशेष कार्यकारी अधिकारी, विभागीय आयुक्तांची कार्यालये
सर्व जिल्हाधिकारी कार्यालये
सर्व जिल्हा नियोजन अधिकारी
सर्व प्रशासकीय विभागाखालील विभागप्रमुख
सर्व एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
मा.प्रधान सचिव (आ.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
आदिवासी विकास विभागातील सर्व उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, आ.वि.वि, मंत्रालय,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ,नाशिक
आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे
संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई.
निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२